या संग्रहांत माझीं कांहीं निवडक बालगीतें प्रकाशित होत आहेत. यांतील 'राग', 'दिनचर्या' आणि 'घाल घाल पिंगा वाऱ्या' हीं तीन गीतें 'उज्ज्वला' या माझ्या पहिल्या कवितासंग्रहांतून घेतली आहेत. 'तृणबाळें होऊं' हें मुंबई सरकारच्या 'मराठी वाचनमाला—चौथें पुस्तक' यांत संग्रहित झालेलें आहे.

या संग्रहांतील सर्व चित्रें येथील 'चित्रमंदिरां'तील श्री. हुबळी, श्री. परांजपे व श्री. कुलकर्णी या चित्रकार-मित्रांनीं काढलेली आहेत. छपाईच्या दक्षतेचें श्रेय श्री. एन्. जे. राणे यांचें.

प्रकाशक : बी. बी. कुरणे,
'स्वाति-प्रकाशन',
'वसंत-विहार' बुकडेपो,
बेळगांव.

मुद्रक : जी. के. कुट्रे,
'राजकमल प्रिंटिंग प्रेस,
बेळगांव.



प्रथमावृत्ति—१९५४.

**कृष्ण बलवन्त निकुम्ब**
**यांचीं पुस्तकें**

**‘ उज्ज्वला ’**
[ निवडक कविता ]

**‘ उर्मिला ’**
[ निवडक कविता ]

**‘ सायसाखर ’**
[ बालगीतें ]

आगामी
**स्वप्नसखी**
[ कणिका व इतर कविता ]

# साय-साखर

झाली बाई सायंकाळ
गाई आल्या ग गोठ्यांत
रडूं तरी कां डोळ्यांत—
सोनयाच्या ?

नको रडूं माझ्या फुला !
जाऊं या हं हंमाकडे
गोड गोड दुदू गडे—
काढायाला !

साय-साखर राजाला
फार आवडते बाई !
छे ग, तुला नाहीं ताई,
मिळायची !

साय-साखरीचें नांव
उडे बाळाची नी घाई
पळूनिया रडूं जाई
क्षणामधें !





# आम्बा पाडाला आला !

१

आम्बा पाडाला आला
झिम्मा खेळूं या चला !
कोणी फुगड्या घाला—
बांधा झाडाला दोला !

२

भर गुलाबा आला
वास अंगणीं झाला
चला, फुलांच्या माळा
घाला डौलानें गळा !

३

गुलबासाचा तुरा—
शिरीं साजरा करा,
लागा गायला कुणी
गोड, मंजुळ गाणीं.

४

—कां ग रुसली इंदु ?
कोण चिडवी ?—सिंधु ?
तिचं—नको तूं स्फुंदू—
घर उन्हांत बांधूं !

५

पुरें रुसणं बाई !
आतां या, करा घाई
पन्हं पाहतं वाट
चला उडवूं थाट !!

## गागा-

चंदनी पाट, पुढें　　चांदीचं ताट ग
चांदीच्या ताटामध　　साळीचा भात ग
साळीच्या भातावर　　दुधाची साय ग
साखर ताई, वर　　वाहून जाय ग
बाळाचा काय आतां　　उडाला थाट ग–
–भरला कां हा परि　　काजळकांठ ग–

–कळालं, रांगोळी न　　घातली भोंतिं ग
कपाळिं म्हणुन याच्या पडली आंठी ग !



# नको कोणी बोलूं बाई !



नका कोणी बोलूं बाई, माझ्या सोनुलीला !
कोमेजेल क्षणीं माझा गुलाबांचा झेला !
नका कुसकरूं गाल भलतें होईल—
टपोरीं हीं दोन फुलें चुरुनी जातील.
ओठ खालचा हळूच येईल पुढारा
होईल नी मुखचंद्र पार गोरा मोरा !
डबडबूनी जातील आंसवांनीं डोळे
पाहूनीया लाजतील कमळांचीं दळें !
बोल कांपरा, तुटक येईल मुखींचा
ओघ सुरू होईल नि गंगा-यमुनांचा.
—जाईजुईमोगरीच्या दुलईवरती
पहुडूं द्या तिला, हसूं खेळूं द्या नुसती !

—नका कोणी बोलूं बाई, पोर ही मानाची—
थोरांमोठ्यांची हो पुढें सून ही व्हायाची !

# उगी उगी !

१

उगी-उगी रडूं नको
ताई माझी चांदणी !
जडवीन तुजलागीं
वैभवाच्या कोंदणीं !

२

रडूं नको—ताई माझी
सोनचांफ्याची कळी
हांस गडे उमलूं दे
सुकुमार पाकळी !

३

उगी उगी—ताई माझी
कोवळी हो काकडी
मिठावांचूनीहि हिची
कांहीं न्यारीच गोडी !

४

रडूं नको—ताई माझी
कन्हैयाची बांसरी
बोल बाई ! बोल तुझीं
गोड गाणीं हांसरीं !

५

मुलखाची रडकी—जा !
नाहीस तूं आमची !
—हांसली रे हांसली ! वा !
लबाडी ही कुठची !

सोनियाचा करुनिया पाळणा सुन्दर
मऊ मऊ रेशमाचे लावियले दोर
मोतियांच्या झालरीनें सजविलें छत—
शोभिवन्त वर किती चिमण्या पोपट !

इवलिशी सोनुल्याची माझ्या मऊ गादी
इवलिशी उबदार शाल हवी आधीं !
इवलासा बाळ शान्त झोंपेल ग बाई
इवलिशी ताई त्याला गाईल अंगाई

झोके देते पुन्हां पुन्हां पाळणा हालतो
झोंप नाहीं छकुल्याला कां ग, हा रडतो ?
—बघ वर, पोपटाला माणकाची चोंच !
छे ग, बाई, काय करूं ? नावडे कांहींच !

निजवुनी माण्डीवर थोपटिते तुला—
नीज—अगबाई ! याचा लागला की डोळा !

# मिठी–

"बाळा चल, खेळ पुरे, काय असा चाळा ?
ढळला दिन–अजुनिहि कां खेळा नच आळा ?

पसरल्यात लांब लांब झाडांच्या छाया
पश्चिमेस रेखियल्या सुंदर रांगोळ्या
हंबरते गाय, परि न खेळ पुरा झाला !

दूध गोड कपिलेचें, साय मऊ दाट
बाळाचा मोठ्ठा हं ऽ उडणारच थाट
जम्मत हंऽ देऊं या खाऊ बाळाला !

दमुनि चिऊ-काऊ त्या, दडल्या घरट्यांत
ओसरली रहदारी–सर्व दिसे शांत
कुरकुरतो मात्र, ऐक, शिणला झोपाळा !

येइल झणिं जगतावर आतां अंधार
किरकिरतिल रात्रीचे चिमणे सरदार
सांगूं कां 'तिकडे' ? चल, काय असं बाळा !

काजळांत बुडवि रात काळी जगताला
कांबळ बघ, पांघरुनी बागुल ये काळा–"
–आईच्या तोंच मिठी पडली पायाला !

# विमान.

सहजींच सकाळीं मी
    उभा होतों अंगणांत,
फूल-पांखरांची मौज
    छोट्या पुष्पाला दावीत.

फूल-पांखरूं उडतां
    मनीं फुटून उकळ्या
इवलाल्या हातांनीं ती
    होती वाजवीत टाळ्या.

नोंच आभाळीं कुठून
    आलें विमान भरारा
" फुलपांखरूं केवढें "–
    म्हटलें मीं " बघ जरा ! "

झेंपावत वर-खालीं
    गेलें निघून विमान
कौतुकानें पुसलें मीं
    पुष्पाराणीला चुंबून:

" फूल-पांखरूं तें मोठें–
    कुठें गेलें, सांग गडे ! "
ऐका उत्तरीं नवल:
    " गेलें त्याच्या आईकडे !"

# एक, दोन, पांच तीन—

काळे काळे बूट हिचे—गोरे गोरे पाय
ठुमकत ताई माझी शाळेमधें जाय—
निळ्या-अस्मानी फ्रॉकला जांभळी किनार
टेका धरी पावलांनीं—डौल मजेदार !
लटकतो डावीकडे दप्तराचा थाट
हंसतांना उसळते चांदण्याची लाट
हलती-कलतां मान—कानांतले डूल
रेशमाच्या वेलीला ये मखमलीचें फूल!
बिघडतां मात्र जरा कोवळी ही आग—
इवल्याशा नाकावर बसे मोटा राग !
—अजुनिही सांगतां न येई ना का नांव—
मात्र मुखावर जाड्या पंडिताचा आव ! —
“शिकविते तुम्हा,” म्हणे—माझा निरुपाय!”
“एक, दोन, पांच, तीन—सांगा, पुढें काय?”



१

दाट साईच्या दह्यांत
कालविला मऊ भात—
चल ताई, जेवायला
कुठवर पाहूं वाट !

२

रुसली कां वेडाबाई ?
समजावूं तरी किती !
कध्धीं नाहीं म्हणायचा
‘ तुझी बाहुली नकटी ! ’

३

लपंडाव खेळतांना
हळु चोरून पाहून—
लपलीस कुठें त्याची
नाहीं करणार खूण !

४

नाहीं तुझ्या मैत्रिणीशीं
करायचा धुसफूस—
माझ्या गळ्याची शप्पत !
चल बघूं डोळे पूस !

५

—चल ताई, जेवायला
कालविला दहींभात—
तुझ्याविना माझ्या गळां
घांस नाहीं उतरत !

## ऊन-पाऊस–

आई ग आई  रांगतो बाळ
रुणझुणती  पायींचे चाळ
ध्वनि तयांचा  होय मंजुळ
पहा ग आई, खुळ्याचा खेळ !
–अय्या! हंसला लुच्चा खुद्कन
लबाड कसा  टाकी मोहून !

आवाज होई  चाळांचा गोड
काय वाजतं ? बाळाला कोडं !
सभोंवतालीं  पाही निरखून
मधेंच लावी  टक दुरून.
उगीच कां ग, हांसे खुद्कन ?
कित्ती चांगलं  आपुलं सोनं !

माझ्याजवळ रांगत येतो
पर्कर धरी— वर बघतो
पळतां मी, तो पार फसतो
परि धराया पुन्हां धांवतो!
शिवाशिवी ही आमुची चाले
अखेर त्याचे भरती डोळे

पडला कां ग? लागे रडाया—
कडेवरती या हो, बाळा या!
म्हणे "मी शूर!"-शूर रडे कां?—
फुलली तोंच नेत्रीं चंद्रिका—
पुसून डोळे पापा घेतला—
ताईन, गोड— बाळ हांसला!

उतरूं पाहे कडेवरून
ताईचे, पाही डूल ओढून!
त्रासून तिनें ठेविलें खालीं
शिवाशिवीही सुरू तों झाली!
—हंसूं नी रडूं ऊन-पाऊस—
बाल्यींचा असा गोड विलास!





## चि. पुष्पा–

छकुलीचे डोळे–निळीं गोकर्णीचीं फुलं
श्वासांतुन गोड जाई-जुई दरवळे !
छकुलीचे ओठ–छे हो ! अमृताचे गर
गोड म्हणून सारेच खाऊं नका बरें !
छकुली हांसते–जादू उधळी आगळी–
धरणी-मोलाची गालीं गोड गोड खळी.
छकुलीचें भाळ गोरें–केवड्याचें पान
हुबेहूब आईची ही चेहेरे-ठेवण !
टपोर, फुगीर गाल–गुलाब फुलते
नाक मात्र जरासें हें वाटतें नकटें
–घालतां मुरणी, सारें जाईल शोभून
थोर थोर परणाया धांवतील; पण–
–एवढ्या ह्या वैभवाची राणी, माझी सोनी:
असेल कां तोलाचा हो, राजा त्यांत कोणी?

# फुलांची राणी

वाड माझ्या परसांत शेवन्ती फुलली
शेवन्ती फुलली
पिंवळ्या या गुलाबाची हंसली पाकळी
हंसली पाकळी
वाऱ्यावर तुळशीची डोलते मंजिरी
झुलते मंजिरी
सडा अंगणीं ले ! शालू शोभतो अंजिरी
शोभतो अंजिरी
रांगोळी ले ! शालूवर फुलें ही काढिते,
कशिदा रेखिते—
पोर माझी ले ! फुलांची राणी ही भासते,
गालीं ही हांसते !

# रुसूं बाई !

रुसूं बाई, रुसूं नका
कोपऱ्यांत बसूं नका
  –कुणीं झांकले हो डोळे ?
ओळखा हं ! फसूं नका !

रुसूं बाई, रुसूं नका
कडेवर बसूं नका
  –पापा घेतलाच आम्ही !
पुसा गाल ! सोसूं नका !

रुसूं बाई, रुसूं नका !
चुलीपाशीं बसूं नका
  –पानीं पडली करंजी
अहो, अशा हसूं नका !



चला जाऊं साऱ्या जणी    दूर पांखरांच्या रानीं
ऐकूं गाऊं या मंजुळ    रान-पांखरांचीं गाणीं
हंसूं खेळूं फुलांसंगें    घेऊं गोड गोड वास
तोडूं नका मात्र कोणी    नका दुखवूं जीवांस
फुलपांखरांशीं खेळूं    शिवाशिवी लपंडाव
सांपडतां पुसूं त्यांना    'काय आपुलें हो, नांव?'
मन आपुलें रमाया    मैना दावील गाऊनी
तिला सांगूं या आपण    राजा-राणीची कहाणी.
हिरवळीवर पडूं    टक लावून आकाशीं
घालूं उखाणे मजेचे    इवलाल्या चिमण्यांसी.
मग भेटाया आपणां    पऱ्या तेथें जमतील
खेळूं फुगड्या तयांशीं    साऱ्या हरूनी जातील !
होतां सायंकाळ, घरीं    येऊं हळूच परत
ठेऊं दडवून सारी    गोड आपुली जमत !

—मात्र गोष्ट ऐकायाला    आजी बोलावील जेव्हां
आपणच आजीला ही    गोष्ट नवी सांगूं तेव्हां

# तृणबाळें.



तृणबाळें होऊं, क्षणभर, तृणबाळें होऊं:
गड्यांनो तृणबाळें होऊं.

पैंजण घालुन नाचत मुरडत
निर्झर येईल ठुमकत ठुमकत,
हंसून करूं या त्याचें स्वागत,
तुषारांत न्हाऊं, क्षणभर, तुषारांत न्हाऊं:
गड्यांनो, तृणबाळें होऊं.

चपल वारुवर आरुढ होउन
उटी फुलांची अंगीं लावुन
अवखळ वारा येइल धांवुन,
डुलत झुलत राहूं, क्षणभर, डुलत झुलत राहूं:
गड्यांनो तृणबाळें होऊं.

लेउन मंदिल निळे जांभळे
लाल गुलाबी सुंदर पिवळे
गुजगोष्टी करिती रानफुलें.
त्या ऐकत राहूं, क्षणभर, कान हळुच देऊं;
गड्यांनो, तृणबाळें होऊं.

लांब सावल्या पडतां गगनीं—
रंग नाचतिल फेर धरोनी,
सोन्याची मग होइल धरणी,
टक लावुन पाहूं, क्षणभर टक लावुन पाहूं;
गड्यांनो, तृणबाळें होऊं.

आणि कधिंमधीं सायंकाळीं
येतिल फिरण्या बाल मंडळी,
हळु पायाला करुनि गुदगुली
गमतीनें हंसवूं, क्षणभर, गमतीनें हंसवूं;
गड्यांनो, तृणबाळें होऊं.



# दिनचर्या—

१

पूर्वेचिया उंबऱ्यांत
  ठेंच उघेला लागली
'नंदनां'त वेंचलेलीं
  फुलें चोफेर सांडलीं
आणि लाजेनें चढली
  लाजरीच्या गालीं लाली—
तोंच फजिती बघाया
  स्वारी बाळाची उठली !
—झालें ! कशाचें हो आतां
  सुचायाचें कामधाम !
जागा जाहला ना माझा
  गोकुळींचा घनःश्याम !

२

साय-साखर घालून
  भात भरवते बाई !
झाली डवल्या हातानें
  जेवायाची याला घाई !
पहा तरी तोंड ! लागे—
  ओठावर साय-शीत
मोगऱ्याची पडे कळी
  गुलाबांच्या पाकळ्यांत !
ये ग ताई, ये ग गाई,
  ये रे काऊ, ये ग चिऊ.
बाळ बैसला जेवाया
  सारे याला घाला जेवूं !

३

चाळ वाजती मंजुळ,
  तान स्वर्ग-संगीताची ?
नको धावूं दुडदूड
  स्वारी कुठं पडायाची !
—बसायाचं झोल्यावर ?
  काय फिरली लहर ?
घर-भर बाळ-राजे !
  तुम्हीं मांडिला कहर !—
—आला राग कां ? भरला
  काजळकांठ हो कशानें ?
धरणीला घालणार
  काय मोतियांचें लेणें ?



४

करा गाई ! चांदण्याची
  शुभ्र घालते दुलई.
मिटा हळूच पाकळ्या
  काय तरी असं बाई !
इतुक्यांत येईलच
  फुलूनीया रातराणी
तिची सुवासाची बोली
  गोड गाईल ती गाणीं
—झोपीं जाणार बरं कां
  क्षणीं बाळ-राजे मग !
स्वप्नीं फुलांचें-पऱ्यांचें
  आणि बहरेल जग !

—:०:—

# घाल घाल पिंगा वाऱ्या !

घाल घाल पिंगा वाऱ्या ! माझ्या परसांत
माहेरीं जा सुवासाची कर बरसात !

" सुखी आहे पोर "—सांग आईच्या कानांत—
" आई-भाऊसाठीं परी मन खन्तावतं !
विसरली कां ग ऽ ? भाद्व्यांत वर्स झालं
माहेरींच्या सुखाला ग मन आंचवलं.
फिरुन फिरुन सय येई, जीव वेडावतो
चन्द्रकळेचा ग शेव ओलाचिम्ब होतो !
—काळ्या कपिलेची नन्दा खोडकर फार,
हुंगहुंगूनीया करी किती ग बेजार !
परसांत पारिजातकाचा सडा पडे,
कधीं फुलं वेंचायला नेशील तूं गडे ?
—कपिलेच्या दुधावर मऊ दाट साय
माया माझ्यावर दाट जशी तुझी माय...! "
[ आले भरून् डोळे पुन्हां ! गळा नि दाटला—
माऊलीच्या भेटीसाठीं जीव व्याकूळला ! ]

घाल घाल पिंगा वाऱ्या ! माझ्या परसांत
माहेरीं जा सुवासाची कर बरसात !



पहाटेची वेळ–वारं वाहतसे गार
        बाई ! वाहतसे गार
दुलईची ऊब वाटे किती मजेदार !

दूर कुठें मंदिरांत झाला घंटा-नाद
        बाई ! झाला घंटा-नाद
कानीं आले आरतीचे गोड पडसाद !

भूपाळीची ओळ घोळे कुणी वारंवार
        गाई कुणी वारंवार
नयनींची नीज झाली नकळत पार !

माझ्या अंगणांत बाई ! फुले पारिजात
        मृदु फुले पारिजात
येई त्याचा दरवळ वाऱ्यावर गात.

पानं-फुलं वेंचूं बाई ! भिजलीं दंवांत
        सारीं भिजलीं दंवांत
माऊलीच्या मायेच्या मी भिजें वर्षावांत !

केशराची पिचकारी देव आकाशांत
        सोडी देव आकाशांत–
वंदनाला आपोआप जुळाले हो हात !